२०२००९१४१२१३३८५०१७

**कोवीड/नॉन कोवीड रुग्णांसाठी HRCT चाचणीचे दर निश्चित करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
सार्वजनिक आरोग्य विभाग
गो. ते. रुग्णालय संकुल इमारत,
१० वा मजला, मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
शासन निर्णय क्र. कोरोना-२०२०/प्र.क्र.३९७/आरोग्य ५
दिनांक : २४ सप्टेंबर, २०२०

**संदर्भ :**

१) साथरोग कायदा, १८९७.
२) आपत्ती व्यवस्थापन कायदा २००५.
३) मेस्मा (अमेंडमेंट) ॲक्ट २०११.
४) द मुंबई नर्सिंग होम (अमेंडमेंट) ॲक्ट, २००६.
५) द बॉम्बे पब्लीक ट्रस्ट ॲक्ट,१९५०.
६) शासन निर्णय समक्रमांक दि. १५ सप्टेंबर, २०२०.

**प्रस्तावना :-**

संदर्भ क्र. ६ मध्ये नमूद शासन निर्णयानूसार राज्यात HRCT- Chest तपासणीचे दर निश्चित करण्यासाठी समिती स्थापन करण्यात आली आहे.

दिनांक ३०.०४.२०२०, २१.०५.२०२० व दिनांक ३१.०८.२०२० च्या अधिसचूनांमध्ये विविध उपचार/तपासण्यांचे दर पत्रक नमूद आहे. तथापि, या तपासण्यांव्यतिरिक्त रुग्णांसाठी सीटी स्कॅन सारख्या तपसण्यांची आवश्यकता भासत आहे. या तपासणीसाठी खाजगी रुग्णालये किंवा सीटी स्कॅन तपासणी सुविधा उपलब्ध असलेल्या तपसणी केंद्रांकडून अवाजवी रक्कम आकरण्याबाबतच्या तक्रारी रुग्णांकडून/लोक प्रतिनिधींकडून प्राप्त होत निदर्शनास आल्याने HRCT- Chest चाचणीचे दर निश्चित करण्यासाठी संदर्भ क्र.१ मध्ये नमूद शासन निर्णयानूसार समिती स्थापन करण्यात आली आहे. या समितीने HRCT- Chest तपासणीसाठी वापरण्यात येणाऱ्या विविध क्षमतेची तपासणी यंत्रे स्थान, तपासणीसाठी लागणारे तज्ञ, तांत्रीक व अतांत्रीक मनुष्यबळ, विज बिल, कंझ्युमेबल व कोविड प्रार्दुभावाच्या पार्श्वभूमीवर लागणारे पी.पी.ई. किट डिसइनफेक्टंट, व सॅनिटायझेशन इत्यादी सर्व बाबी विचारात घेऊन विविध रुग्णालये व तपासणी केंद्र चालकांशी चर्चा करुन त्यानूसार आपला अहवाल शासनास सादर केला. त्यानूसार शासन HRCT- Chest चाचणीचे दर निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार खालीलप्रमाणे शासन निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

१) राज्यात सर्वसाधारणपणे १६ ते ६४ स्लाईस या क्षमतेच्या मशिन्स HRCT साठी वापरण्यात येत आहेत. त्यानूसार मशिनच्या क्षमतेनुसार HRCT- Chest तपासणीसाठी खालीलप्रमाणे कमाल दर मर्यादा निश्चित करण्यात येत आहे.

| Specifications of CT machine | Less than 16 slice CT | Multi detector CT (MD CT) 16-64 slices | Multi detector CT (MD CT) More than 64 slice |
|---|---|---|---|
| Proposed rate Inclusive of all taxes (in INR) | 2000/- | 2500/- | 3000/- |

उपरोक्त कमाल रकमेत सी.टी.स्कॅन तपासणी, तपासणी अहवाल सी.टी.फिल्म, पी.पी.ई. किट, डिसइन्फेक्टंट, सॅनिटायझेशन चार्जेस व जी.एस.टी. या सर्वांचा समावेश असेल.

१) HRCT-Chest नियमित व तातडीच्या तपासणीसाठी उपरोक्त समान दर लागू रहातील.

२) सदर शासन निर्णय निर्गमित होण्याच्या दिनांकापूर्वी जर कोणत्याही रुग्णालय/तपासणी केंद्राचे HRCT-Chest तपासणी दर उपरोक्त दरापेक्षा कमी असल्यास, कमी असलेले दर तपासणीसाठी लागू राहतील.

३) HRCT- Chest तपासणी केल्यानंतर अहवालावर उपरोक्त पैकी कोणत्या सी.टी. मशिन्सद्वारे तपासणी केली आहे ते नमूद करणे बंधनकारक असेल.

४) सद्य:स्थितीत कोणत्याही डॉक्टरच्या प्रिस्क्रीप्शन्स शिवाय HRCT करण्याची मागणी नागरीकांडून करण्यात येते. या तपासणीमध्ये किरणोत्सर्जन द्वारे तपासणी असल्याने जोखीम असते यासाठी नोंदणीकृत डॉक्टरांच्या प्रिस्क्रीप्शन्स शिवाय ही तपासणी करु नये.

५) HRCT-Chest तपासणी करणाऱ्या रेडीओलॉजिस्टने संपूर्ण तपासणी अहवाल देणे आवश्यक राहील. (apart from lung, mediastinum and bones)

६) ज्या रुग्णांकडे आरोग्य विमा योजना आहे किंवा एखादया रुग्णालयाने किंवा कार्पोरेट /खाजगी आस्थापनेने जर HRCT तपासणी केंद्राशी सामंजस्य करार केलेला असेल त्यासाठी उपरोक्त दर लागू राहणार नाहीत.

७) अन्यथा सर्व रुग्णालये / तपासणी केंद्रे यांनी HRCT-Chest तपासणीसाठी निश्चित केलेले दर (मशिन च्या प्रकारानुसार) दर्शनी भागात लावणे तसेच, निश्चित दरानुसार दर आकारणी करण्याबाबत हॉस्पीटल व्यवस्थापनाला सूचना देणे बंधनकारक राहील.

८) HRCT-Chest तपासणीसाठी निश्चित केलेल्या दरापेक्षा अधिक दर आकारणी केल्यास संबंधितावर कारवाई करण्यासाठी राज्य स्तरावर मुख्य कार्यकारी अधिकारी राज्य आरोग्य हमी सोसायटी व जिल्हा स्तरावर (महानगरपालिका क्षेत्र वगळून) संबंधित जिल्हाधिकारी व संबंधित महानगरपालिका क्षेत्रात संबंधित महानगरपालिका आयुक्त संदर्भ क्र.२ ते ६ मध्ये नमूद केलेल्या कायदयातील तरतुदीनुसार कारवाई करण्यास सक्षम प्राधिकारी राहतील.

९) सदर दर आकारणी साथरोग कायदयांची अंमलबजावणी असेपर्यंत चालू राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावार उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र.२०२००९१४१२१३३८५०१७ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

(किरण वाहूळ)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

४) सर्व अ.मु.स./ प्र.स./सचिव,प्रशासकीय विभाग मंत्रालय, मुंबई.
५) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
६) जिल्हाधिकारी (सर्व).
७) महानगरपालिका आयुक्त (सर्व).
८) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
९) मुख्य कार्यकारी अधिकारी, राज्य आरोग्य हमी सोसायटी, मुंबई.
१०) संचालक, आरोग्य सेवा, मुंबई व पुणे.
११) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई.
१२) डॉ. अनाघा जोशी, (विभाग प्रमुख रेडीऑलॉजी) एल. टी. मेडिकल कॉलेज ॲण्ड सायन हॉस्पिटल, सायन, मुंबई.
१३) अधिष्ठाता, सर जे. जे. रुग्णालय, मुंबई.,
१४) जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय (सर्व).
१५) जिल्हा आरोग्य अधिकारी (सर्व).
१६) निवड नस्ती (आरोग्य-५)

प्रत माहितीस्तव

१) मा. मंत्री (आरोग्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. राज्यमंत्री (आरोग्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.